**मौजे मंगरुळ (ई), ता. चिखली, जि. बुलडाणा येथील पाणी टंचाई निवारणार्थ तात्पूरत्या पूरक नळ योजनेस प्रशासकीय मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः टंचाई २०२२ /प्र.क्र. ४९/पापु १४**

जी. टी. रुग्णालय संकुल इमारत, ७ वा मजला,
मंत्रालय, मुंबई ४०० ००१
तारीख: २७ एप्रिल, २०२२

वाचा -

१) शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग क्रमांक: टंचाई १०९९/प्र.क्र. १२/पापु १४, दिनांक ३.२.१९९९

२) शासन निर्णय पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग क्रमांक: टंचाई २०१६/प्र.क्र.१४३/पापु १४, दिनांक ४.५.२०१६

३) विभागीय आयुक्त, अमरावती यांचे क्रमांक जा.क्र. उपआ/विकास/ पाणी टंचाई (ग्रामीण) कावि /३८५/२२, दिनांक २१.०४.२०२२ पत्र.

४) शासन पत्र क्रमांक स्थासबै-२०२२/प्र.क्र. ५० /पापु १४, दिनांक २७.०४.२०२२ (बैठकीचे इतिवृत्त)

प्रस्तावना -

विभागीय आयुक्त, अमरावती यांनी सन २०२१-२२ च्या पाणी टंचाई कालावधीसाठी मौजे. मंगरुळ (ई), ता. चिखली तालुका, जि. बुलडाणा येथील तात्पुरत्या पूरक नळ योजनेचा प्रस्ताव प्रशासकीय मंजूरीसाठी शासनास सादर केला आहे. सदर प्रस्ताव पिण्याच्या पाण्याच्या टंचाई निवारणार्थ नागरी व ग्रामीण क्षेत्रातील विहित आर्थिक व भौतिक निकषाबाहेरील तात्पुरत्या पाणी पुरवठा योजना / उपाययोजनांना प्रशासकीय मंजूरी देण्यासाठी प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांच्या अध्यक्षतेखाली स्थापन करण्यात आलेल्या सचिव स्तरीय स्थायी समितीच्या दिनांक २७.०४.२०२२ रोजी झालेल्या बैठकीत मान्यतेसाठी विचारात घेण्यात आला.

प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांच्या अध्यक्षतेखाली स्थापन करण्यात आलेल्या सचिव स्तरीय स्थायी समितीच्या दिनांक २७.०४.२०२२ रोजी झालेल्या बैठकीत या प्रस्तावावर सविस्तर चर्चा होऊन प्रस्तावास मंजूरी देण्यात आली. त्या अनुषंगाने सदर प्रस्तावास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय-**

विभागीय आयुक्त, अमरावती यांनी मौजे. मंगरुळ (ई), ता. चिखली तालुका, जि. बुलडाणा येथील तात्पुरत्या पूरक तात्पुरत्या पाणी पुरवठा योजनेचा प्रशासकीय मान्यता देण्याबाबतचा प्रस्ताव संदर्भ क्र. ३ च्या पत्रासोबत शासनास सादर केलेला आहे. सदर प्रस्तावीत तात्पुरती पुरक नळ पाणी पुरवठा योजनेच्या रुपये ५६,९८,७१०/- ( अक्षरी छप्पन लक्ष अठयान्नव हजार सातशे दहा फक्त) किंमतीच्या प्रस्तावास सचिव स्तरीय स्थायी समितीने दिनांक २७.०४.२०२२ च्या बैठकीत मान्यता दिलेली आहे. त्या अनुषंगाने या आदेशान्वये या तात्पुरत्या पुरक नळ पाणी पुरवठा योजनेच्या प्रस्तावास खालील अटींच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे :-

१) जिल्हाधिकारी, बुलडाणा यांनी मौजे. मंगरुळ (ई), ता. चिखली या क्षेत्रात पिण्याच्या पाण्याची टंचाई निर्माण झाली असल्याचे सर्वप्रथम घोषित करावे.

२) सदर प्रस्तावात नमूद केलेली तात्पूरती पूरक पाणी पुरवठा योजना जिल्हा परिषद, बुलडाणा यांचेमार्फत राबविण्यात यावी.

३) प्रस्तुत योजना टंचाई कालावधी संपल्यानंतर चालविण्याची जबाबदारी जिल्हा परिषदेने घेणे आवश्यक आहे. त्याबाबत जिल्हा परिषदेचा ठराव घेण्यात यावा.

४) सदर योजनेची कामे विहित पध्दतीने ई-निविदा मागविण्यात येऊन करावीत.

५) योजनेचे काम मान्यता प्राप्त किंमतीमध्येच पूर्ण होईल याची दक्षता घ्यावी.

६) योजनेची कामे दिनांक २० मे, २०२२ पर्यंत पूर्ण करुन योजनेतून पाणी पुरवठा सुरु होणे आवश्यक आहे. तथापि, या दिनांकापर्यंत योजनेतून पाणी पुरवठा सुरु न झाल्यास योजनेची मान्यता रद्द समजण्यात येईल.

७) सदर योजनेची प्रस्तावात नमूद केलेली कामे जिल्हा परिषद, बुलडाणा यांच्या मार्फत पूर्ण करण्यात आल्यानंतर योजनेची देखभाल दुरुस्ती व योजनेचे व्यवस्थापन संबंधित जिल्हा परिषदेमार्फत करणे आवश्यक राहील.

८) विभागीय आयुक्त, अमरावती यांनी सदर योजनेकरिता निविदा प्रक्रिया झाल्यानंतर योजनेच्या सुरुवातीला ५०% इतका निधी द्यावा. तद्नंतर ३० % निधी विभागीय आयुक्त यांच्या स्तरावर योजनेची प्रगती विचारात घेऊन वितरीत करावा. उर्वरित २०% निधी योजना कार्यान्वित झाल्यानंतर देण्यात यावा.

९) योजनेचे काम मुदतीत पूर्ण होणे आवश्यक असल्याने योजनेच्या निविदा प्रक्रीयेपासून ते योजनेतून पाणीपुरवठा सुरु होईपर्यंत आठवडयाच्या प्रत्येक सोमवारी प्रगती अहवाल शासनास पाठविण्यात यावा.

**याबाबत होणारा खर्च "मागणी क्र. वाय-२, मुख्य लेखाशिर्ष २२१५ पाणी पुरवठा व स्वच्छता, ०१, पाणी पुरवठा, १९६ जिल्हा परिषद पंचायत / संस्थांना सहाय्य, ०२ जिल्हा परिषदांना अनुदान, (०२)(०३) आकस्मिक पिण्याच्या पाण्याच्या टंचाई निवारणार्थ घेण्यात येणा-या तात्पुरत्या उपाययोजनांसाठी जिल्हा परिषदांना सहायक अनुदान (अनिवार्य), ३१, सहायक अनुदाने (वेतनेत्तर) (२२१५ ए १९५) या उपलेखाशीर्षांखाली उपलब्ध असलेल्या अनुदानातून भागवावा व त्याखाली अंतिमत: खर्ची टाकण्यात यावा.**

हा शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभागाने पिण्याच्या पाण्याच्या टंचाई निवारणार्थ नागरी व ग्रामीण क्षेत्रातील विहित आर्थिक व भौतिक निकषाबाहेरील तात्पुरत्या पाणी पुरवठा योजना / उपाययोजनांना प्रशासकीय मंजूरी देण्यासाठी प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे अध्यक्षतेखाली स्थापन करण्यात आलेल्या सचिव स्तरीय स्थायी समितीच्या दिनांक २७.०४.२०२२ रोजी झालेल्या बैठकीत घेण्यात आलेल्या निर्णयानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०४२७१३२६४६६९२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Vasant Bhimrao Mane

Digitally signed by Vasant Bhimrao Mane
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER SUPPLY AND SANITATION DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra,
2.5.4.20=280e2beac20f526041fee94f6226522e1407a7f6aa0b06c8769634d48c2976bc,
pseudonym=04E9E52AD2D2BFBC7A8BAB7F38309149E2A32DAE,
serialNumber=4412BECACEF186C3494A7DFFC4896B9FFD9D66E8EC00DF8E35709DC13741075D, cn=Vasant Bhimrao Mane
Date: 2022.04.27 17:52:13 +05'30'

**(वसंत माने)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१) महालेखाकार, (लेखा परीक्षा / लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१, मुंबई
२) महालेखाकार, (लेखा परीक्षा / लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-२, नागपूर
३) अपर मुख्य सचिव, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई
४) प्रधान सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
५) प्रधान सचिव (नवि-२), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
६) प्रधान सचिव, (म.व पु.) महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई
७) सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, सिडको भवन, नवी मुंबई
८) विभागीय आयुक्त, अमरावती
९) जिल्हाधिकारी, बुलडाणा
१०) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, बुलडाणा

११) अधिक्षक अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, अमरावती.

१२) कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, बुलडाणा

१३) कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, बुलडाणा

१४) मा. मंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई

१५) मा. राज्यमंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई

१६) प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, यांचे स्वीय सहायक

१७) पापु १४ (निवडनस्ती)